सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावयाच्या प्रस्तावांबाबत मार्गदर्शक सूचना.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. ससमा २०२३/प्र.क्र.१०/२०२३/का-१४६१,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २० मार्च, २०२४.

**वाचा :-** १) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.वानियो-१०८९/(८)/योजना-१,दि.६.२.१९८९
२) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.वानियो-१०८९/(८)/योजना-१,दि.८.१२.१९८९
३) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.वानियो-१०८९/(८)/योजना-१,दि.१३.२.१९९०
४) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.वानियो-१०९५/अनौ.सं.७५/का.१४११,दि.२५.४.१९९५
५) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.वानियो-१०९६/अनौ.सं.२८/का.१४११, दि.१६.७.१९९६
६) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा--२०१०/प्र.क्र.४८/कार्यासन-१४६१, दि.७.२.२०११
७) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा--२०१०/प्र.क्र.४८/कार्यासन-१४६१, दि.३०.१.२०१२
८) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा--२०१०/प्र.क्र.४८/कार्यासन-१४६१ दि.८.१.२०१४.
९) नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र.ससमा--२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/कार्यासन-१४६१, दि.११ जून, २०१८
१०) वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१७/व्यय-४, दि.३० जानेवारी, २०२४.

**प्रस्तावना :-** नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन परिपत्रकान्वये नवीन कार्यालयीन व निवासी इमारतींच्या बांधकामावर निर्बंध घालण्याबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले होते. तथापि, अतिनिकडीच्या व महत्वाच्या नवीन इमारतींच्या बांधकामाबाबत हे आदेश शिथील करण्यात येऊन संबंधित प्रशासकीय विभागाने मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीपुढे तसा प्रस्ताव विचारार्थ ठेवावा व समितीने मान्य केल्यास अशी कामे अर्थसंकल्पित व इतर बाबी पूर्ण करुनच हाती घेण्यात यावी अशा सूचना देण्यात आल्या आहेत. नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. २ ते ६ येथील शासन परिपत्रकान्वये सचिव समितीचे गठन व त्याबाबतची कार्यपध्दती या संदर्भातील सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावयाच्या प्रस्तावांची वित्तीय मर्यादा वेळोवेळी वाढविण्यात आली आहे. नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. ७ येथील शासन परिपत्रकान्वये सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करावयाच्या प्रस्तावांची वित्तीय मर्यादा रु. ५.०० कोटी एवढी निश्चित करण्यात आली आहे. तसेच नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.८ येथील शासन परिपत्रक दि.८.१.२०१४ अन्वये इमारती बांधकामास सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.९ येथील दि.११.६.२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये सचिव समितीकडून नवीन निवासी, कार्यालयीन व इतर इमारत बांधकामांना प्रशासकीय मान्यता देण्याच्या वित्तीय मर्यादेत रु.५.०० कोटी वरुन रु.१५.०० कोटी इतकी वाढ करण्यास मान्यता दिली आहे.

मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीसमोर सादर होणा-या बांधकामाचे प्रस्ताव नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्याकडून छाननी न होता प्रशासकीय विभागांकडून परस्पर उच्चस्तरीय सचिव समितीसमोर सादर करण्यात येतात ही बाब निदर्शनास आली आहे. यानुषंगाने वित्त विभागाने संदर्भ क्र.१० अन्वये उच्चाधिकार समितीकडे सादर होणारे सर्व प्रस्ताव नियोजन व वित्त विभाग यांच्याकडून सर्वंकष छाननी करण्याकरीता कार्यपध्दती निश्चित करुन दिलेली आहे. याबाबत नियोजन विभागाकडूनही सूचना निर्गमित करण्याचे विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक :-** नियोजन विभागाच्या संदर्भ क्र.८ येथील शासन परिपत्रक दि.८.१.२०१४ अन्वये इमारती बांधकामास सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. यामध्ये पुढील सूचनांचाही समावेश करण्यात येत आहे.

१) ज्या कामांचे अंदाजपत्रकामध्ये मुख्य वास्तुशास्त्रज्ञाचे नमुना नकाशानुसार (Type Plan) संकल्पन केले आहे तसेच ज्या कामांना नियतव्यय उपलब्ध आहे, अशा कामांचे प्रस्ताव.

२) ज्या कामांचे नमुना नकाशा (Type Plan) नाहीत, पण प्रस्तावात नियमित प्रकारच्या इमारती अंतर्भूत आहेत अशा कामांचे प्रस्ताव जसे की, वसतीगृहे, कार्यशाळा, शाळा, रुग्णालये, प्रयोगशाळा, गोदामे इत्यादी.

३) प्रशासकीय विभागाकडून विशिष्ट प्रकारची (Out of Routine) बांधकामे, ज्यांना शासनाचा नियतव्यय उपलब्ध करावयाचा आहे अशा कामांचे प्रस्ताव. उदा. प्राणीसंग्रहालय, देवस्थाने, दिक्षाभूमी इत्यादी.

४) जे प्रस्ताव कालमर्यादेतील आहेत असे प्रस्ताव नियोजन व वित्त विभागाकडे सादर करताना त्यामध्ये विभागाने कालमर्यादा नमूद करावी.

५) बैठकीच्या अनुषंगाने आवश्यक टिप्पणी किमान ४ दिवस आधी संबंधीत विभागास प्राप्त होईल याची दक्षता विभागाने घ्यावी.

६) वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेतील अटी शर्तीनुसार प्रस्ताव असावा.

उपरोक्त १ बाबतच्या प्रस्तावांची प्रथमत: तांत्रिक तपासणी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करुन असे प्रस्ताव परस्पर मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय समितीकडे सादर करण्यात यावेत. तसेच, २ व ३ बाबतच्या प्रस्तावांची तांत्रिक तपासणी प्रथमत: सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करुन असे प्रस्ताव नियोजन विभाग व वित्त विभागाकडून छाननी केल्यानंतर मुख्यसचिव महोदयांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करणे बंधनकारक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०३२०१८०८३०८५१६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SAURABH VIJAY

Digitally signed by SAURABH VIJAY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=1881d2db26e7def23bb04e11d8b1bf15f88a57c4334fada0f815b878b0a2d44f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=557B72C5074661CF936FC5C18380D6316697D92AD38676D79A0BA3CDD2CC8EE6, cn=SAURABH VIJAY
Date: 2024.03.20 18:18:46 +05'30'

**( सौरभ विजय )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
४. मुख्यसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
६. विभागीय आयुक्त, (सर्व)
७. जिल्हाधिकारी, (सर्व)
८. सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, नियोजन विभाग,
९. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्विय सहायक
१०. निवडनस्ती कार्यायन- १४६१